कुणी झाडावर कोरतं...
कुणी मनावर....
कुणी पाकळ्या भिरकावतं... *Love me - not*
कुणी बेधडक समोर जाऊन... *Love me or not*
कुणी केलं खिडकीआडून लपत-छपत...
कुणी स्विकारलं चार-चौघात खुलेआम...
जे शब्दात साठलं नाही...
आणि
अक्षरी ठरलं नाही...
अशा प्रेमाची ही...
**नेटाक्षरी**



## अतिथी संपादक

शंतनू चंद्रात्रे-दिप्ती घोडेकर
(नाशिक)

## संपादक

भारती सरमळकर (मुंबई)

## सह संपादक

सोनाली घाटपांडे (पुणे)
स्वप्ना कोल्हे (नाशिक)
सचिन काकडे (मुंबई)

*Happy Valentines Day*

ई-साहित्य प्रकाशन
वर्ष दुसरे, अंक ८, दिनांक १४ फेब्रुवारी २०१०



# अतिथी संपादकांच्या हृदयातून......

खरं तर "नेटाक्षरी" च्या अंकासाठी अतिथी संपादक म्हणुन लिहिणं म्हणजे खुप दिवसांनी घरी येऊन आईच्या हातची पुरणपोळी खाल्ल्यावर आईने समोर "बिल" आणुन ठेवल्यावर जसं वाटेल तसं वाटतंय., त्यातुन "प्रेम दिवस" म्हणजे तर एकदम 'होम ग्राउंड'. . असो. . . "आपल्याला उगाच विशेष असा दिवस असण्याची काही गरज नाही", "आपलं नातं काय या एका दिवसासाठी नाही", "आपल्यासाठी तर काय रोजच प्रेमदिवस" या सुराची वाक्यही बरीच ऐकायला मिळतात या दिवशी... पण काहीही झालं तरी प्रेमी युगुलांचा असा एक प्लॅन असतोच या दिवशी. . . पाडगावकर म्हणतात कि "प्रेम तुमचं आणि आमचं एकदम सेम असतं" . . सॉरी बॉस ! ! कविता म्हणुन आवडली तरी ती ओळ एक सिध्दांत म्हणुन न पटण्यासारखी आहे. . प्रेम सेम नसतं आणि नसावंही "मिठी" ही समोरून पहाणा-या तिस-या माणसासाठी जरी सारखीच असेलही पण दोन प्रेमात गुरफ़टलेल्या जीवांच्या अगणित अव्यक्त भावना शब्दांचं रुप न घेता व्यक्त होत असतात त्यातुन आणि हा दिवस म्हणजे तर त्या भावनांना अधिकच उधाण आणणारा. .

वाढ तर रोजच होते पण वाढदिवस असतोच ना खास !! मग अश्या खास दिवशी आपल्या खास माणसासाठी काहि खास नकों करायला ? शेवटी प्रेम काय आहें हों ? एकाच ताटात असलेला एक घास आहे. तो खाताना हॊणा-या आनंदापेक्षा आपल्या जिवलगाला भरवताना जास्त आनंद होतो इतकंच . .

आता एक खास गॊष्ट शेअर करतों तुमच्याबरोंबर. मला किंवा दिप्तीला खरचं देवाशपथ आठवत नाहिय की पहिल्यांदा *"I love you"* कोण कोंणाला म्हणालं...! प्रेम कसं जडलं आणि कधी जडलं हे सांगण नाही शक्य....महत्वाची आणि आनंदाची गॊष्ट हीच की ते जडलं... आमच्या नात्याची एक जमेची बाजू कदाचित आमची मैत्री असावी. आज पाच वर्ष झाली तरी तिच्यातली प्रेयसी आणि मैत्रीण या दोघी वेगवेगळ्या अस्मिता मला प्रकर्षाने जाणवतात...कदाचित तिलाही जाणवत असेल... पण एक गॊष्ट नक्की... प्रेमात पडलं ना की संदीप खरेच्या कवितांचा अर्थ वेगळाच उमगायला लागतों.

तुम्हा सगळ्यांना प्रेमदिवसाच्या हार्दीक शुभेच्छा . . ! !



*Happy Valentines Day*

**शंतनू चंद्रात्रे - दिप्ती घोडेकर**

अतिथी संपादक

# एक शहाळं . . . दोन स्ट्रॉ

वीस वर्षापुर्वी
जन्माची साथी झालेल्या
चाळिशीच्या चष्म्यातुन पाहताना
विश्वासच बसत नव्हता डोळ्यांवर

समुद्रकिना-याजवळच्या त्याच खडकावर,
त्याच खारट वा-यावर,
आपल्या केसांची बट उडु देत,
मावळतीच्या सुर्याच्या डोळ्यात
विरह शोधत बसलेली,
हि तिच का ?? हो नक्की ती . . .

तो किनारा साक्षीदार होता,
पहिली भेट, पहिला शब्द, पहिला स्पर्श
पहिलं मौन, पहिला अश्रु, पहिली हुरहुर,
पहिली मिठी, सगळ्याचा

आज पुन्हा चाळीस वर्षांनी
संसाराचा पडदा बाजुला सारुन,
जबाबदा-यांचं ओझं झटकुन
तिला पाहताना अचानक तरुण झालो,
आणि हळुच मागुन जावुन
डोॅळ्यांवर हात ठेवला तिच्या.

तिच्या थरथरणा-या स्पर्शाने अचुक वेध घेतला,
मग शेजारी बसुन गप्पाही ब-याच झाल्या. .
स्पर्श न सोडता. .



“ तु कधी आलीस उठून कळलंच नाही “
“डोळा लागला होता ना स्वारींचा,
म्हंटलं शेजारच्या जोशीबाईंना. . विचारावं येता का “ ?
“ बरं झालं ना त्यांचे गुडघे आजच दुखले ते. . . “

“चला बाई ! ! तुमचं आपलं भलतंच ! ! !
शहाळं पिणार ?
“हो”
मग एकमेकांना सावरत,
खडकावर तोल सांभाळत,
रोजच्या शहाळ्यावाल्याकडे आलो. . . .

“दोन पाणीवाले दे रे. . ;”
हे माझ्या जीभेच्या टोकाशी आलेले असताना
आज तीच म्हणाली. . .
“मलाईवालं द्या.. . एक शहाळं .. दोन स्ट्रॅा. . .

♡ ♡ ♡

**शंतनू चंद्रात्रे**
अतिथी संपादक - नाशिक

# डॊळे बंद केले अन......

शारदिय संध्याकाळ
निळाशार तळ्याचा काठ
तुझी वाट....
डॊळे बंद केले अन पुसून टाकलं सारं काही
पापण्या किलकिल केल्या, सावरुन घेतलं काहीबाही....

चांदण भरलं नक्षीदार नभ
मधाळ दुधाळ पूर्ण चांदवा
ऒंजळीत झेलणारे माझे हात.....
डॊळे बंद केले अन पुसून टाकलं सारं काही
पापण्या किलकिल केल्या, सावरुन घेतलं काहीबाही....

वेचून आभा, बुडवून नभा
ऒजस्वी प्रभा....
डॊळे बंद केले अन पुसून टाकलं सारं काही
पापण्या किलकिल केल्या, सावरुन घेतलं काहीबाही....

मानस मॊहीनी स्वप्नांचा गाव
कुरतडणारे घाव
ठरलेला ठाव
डॊळे बंद केले अन पुसून टाकलं सारं काही
पापण्या किलकिल केल्या, सावरुन घेतलं काहीबाही....



चंद्रमाधुरी ऒलावा, क्षीण सुरातील पावा
नित्य तोच दुरावा
डॊळे बंद केले अन पुसून टाकलं सारं काही
पापण्या किलकिल केल्या, सावरुन घेतलं काहीबाही....

♡ ♡ ♡

.......सुरुचि नाईक (नागपूर)

# प्रेम म्हणजे......

अथांग पसरलेलं.....काळं
निळंसावळं आकाश आणि
त्यावर चमकणारे....
हजारो तारकापुंज न्याहाळंत
ज्यांच्या अनेक रात्री जागतात
कदाचित त्यालाच.....

विस्तीर्ण आणि निर्मनुष्य अशा
धरणीस पाठ टेंकवून शुभ्र
चांदणगोफ पहाण्यात......
ज्यांना स्वर्गसुख मिळतं
कदाचित त्यालाच.....

संथगतीने वर येणारं चंद्रबिंब
त्याच्या दुधाळ, पारदर्शी प्रकाशात
न्हाऊन जाण्याची नशा.......
जे चिंब मनाने अनुभवतात
कदाचित त्यालाच......
त्यालाच प्रेम म्हणतात........



## ........साक्षी सुर्वे (मुंबई)

प्रेम म्हणजे...... चिंब भिजवणारा पाऊस, नाजूक रंगीत फुलपाखरु, कातरवेळी हातात हात घालून समुद्रकिनारी दूर-दूर भटकणं, वा-याची गुणगुण करणारी झुळूक, एक गुलाबी पहाटस्वप्न, चोरुन भेटणं, रागावणं, रुसणं आणि..... बरंच काही...........



.........दिपक साळुंके-सईमय (पुणे)

भातुकलीच्या खेळामधलं असो की कॉलेजच्या कट्ट्यावरचं
वय कोवळं असो की वयात आलेलं, प्रेम आयुष्याला वळण हे देतच असत
आणि मनाला हे होतच असतं, हळवं बिळवं होऊन रहायचं तरी कसं?
काही तरी होतयं मनामध्ये याला प्रेम म्हणायचं तरी कसं?

# ती बोलते डॉळ्यातुनी........

ती बोलते डॉळ्यातुनी ती शोधते सा-यातुनी
ती लुकलुकते बावरते ती चांदणी ता-यातुनी

तिच्या सहवासाचे क्षण किती वेडे
कधी अलिकडे मन धावे पलीकडे
ती कुजबुजते चाचरते ती भावना शब्दातुनी

आठवांचे नभ डॉळा भरते कितिसे
हलकासा स्पर्श उरी दाटते उसासे
ती हुरहुरते सावरते ती स्पंदना माझ्यातुनी

कुणी म्हणे प्रेम याला खुळ्याचे हे खुळ
कुणी झुठमुठ म्हणे उनाडसा खेळ
ती गलबलते ऑलावते ती वेदना ह्रदयातुनी

ती बोलते डोळ्यातुनी ती शोधते सा-यातुनी
ती लुकलुकते बावरते ती चांदणी ता-यातुनी

# जिवघेणे बहाणे........



धुंदीत वेड्या मनाचे रहाणे
त्यावर तुझे जिवघेणे बहाणे

उगा रात आली नशीली नशीली
जर कोवळीशी जरा झींगलेली
वेड्या मनाचे हे वेडे तराणे
त्यावर तुझे जिवघेणे बहाणे

पुन्हा त्या अदा काळजाला चिरु दे
खुणा काजळाच्या पुन्हा पाझरु दे
पुन्हा श्वास गातील तेच गाणे
त्यावर तुझे जिवघेणे बहाणे

सावरुदे मला तोल पदराचा राणी
कांकणांची भिती खोटी खोटी कहाणी
उश्यांचे उसासे पैजणांचे खनकणे
त्यावर तुझे जिवघेणे बहाणे

मिठीच्या शहारी गुंतुदे श्वास आता
जगाचा इथे ना तिथे भास आता
ओठांचे ओठांत गुंतुन जाणे
त्यावर तुझे जिवघेणे बहाणे

जिवघेणी खुळी रात गेली कशाला
तुझे श्वास श्वासात उरले उशाला
तुला हाक देता तुझे दूर जाणे
त्यावर तुझे जिवघेणे बहाणे

........मकरंद सावंत (मुंबई)

शरीराची लक्तर झाली तरीही जेव्हा समोरच्या व्यक्तीला आपल्याला घट्ट मिठी मारावी, गोंजाराव असं वाटत असेल ना..... तर ते प्रेम, वय, रुप, रंग, भाषा पलीकडलं तरीही खुप जवळच...असं काही

# स्पर्श......

हवाहवासा वाटणारा सहवास तुझा
अन निसटून जाणारी वेळ
अडकून पडलेले शब्द माझे
अन तुझ्या रागाचा तो मेळ

व्यर्थ प्रयत्न माझा
शब्द सारे सोडवण्याचा
ताटकळलेल्या जिभेला माझ्या
शब्द सारे पुरविण्याचा

अनावर झालेला राग तुझा
अन तुला मनवायचा अट्टाहास माझा
शब्दाविना सारे सांगून जाणारा
बोलका असा स्पर्श माझा

♡ ♡ ♡



## ......पुजा कोरगांवकर (ठाणे)

प्रेम म्हणजे काय विचारलं होतस ना?
तर प्रेम म्हणजे बंधन.... मनाला आवडणारं
आणि विश्व नव्याने उमगलेलं........
तशी प्रेमाची व्याख्या माणसाबरोबर बदलत जाते..
पण मला असं वाटतं..........

# अबोल ही प्रीत तुझी.......

अंतरी जे दडले तुझ्या सांगशील का रे कधी ?
अजुनही न कळे मज, अबोल का ही प्रीत तुझी . .?

असतोस मज सवे तु, जशी माझी सावली..
हीच ती प्रेमळ अदा, मनास माझ्या भावली..

दुर मी जाता जराशी, मन का तुझे उदास होई
भाव ते तुझ्या मनीचे, आसवे मग सांगुन जाती. .

खुणावुनी  नजरेने कधी, घायाळ करशी या जीवा. .
मन होई बेभान माझे, नभी जसा बेधुंद पारवा. .

सुख-दुःखाच्या हिंदोळ्यावर, दिलीस मला तु साथ सदा
म्हणुनी वाटते मनाला, हात तुझ्याच हाती हवा. .

हा तुझा असा अबोला, एव्हढीच खंत रे.. .
सांग रे काय तुझ्या मनी, पाहसी का अंत रे. . .!!

♡ ♡ ♡



.......अमिता डावरे (ठाणे)



......सोनाली घाटपांडे (पुणे)

प्रेम म्हणजे... ओह के एक मिनिट हं... प्रेम म्हणजे भावना, मनात उमटलेले भावनांचे तरल तरंग. भावना काय कोणाबद्दलही वाटू शकते, म्हणजे झालचं तर, फुलं झाडं, पक्षी, प्राणी ....... आणि मगं वेळ राहिलाचं तर माणूस. प्रेम म्हणजे काही वेगळं असतं का ? प्रेम समजून घेता येत नाही ते अनुभवायचं असतं. प्रेम म्हणजे काय हे विचारण्यापेक्षा प्रेमात पडा आणि मगं पहा गंमत. मग तुमचं 'यें कहॉं आ गये हम' होतं की 'तेरे मेरे सपने अब इक रंग है' होतय ते पाहूया...... काय दोस्तांनो ???

# सख्या रे !

सख्या रे !
साद घातली तुला मी
सांग मला ओळखावे
कसे तुला मी ??

कधी हसतोस अस्स
की वाटत
ह्याच्याशिवाय आपलं कोणीच नाही ......

सख्या !! सांग मला
तुझं खरं रुप कोणतं ??
माझ्या मनातलं की
लोकांच्या जगातलं ??

तुझ्या अव्यक्त रुपात
स्वतःला शोधणारी मी .......
आणि तू दाखवतोस
माझचं अद्वैत रुप !!!!

♡ ♡ ♡



# तुला आठवायची गरज........

तुला आठवायची गरज
मला कधीच पडत नाही
कारण आठवण्यासाठी
विसरावं लागत
आणि तुला विसरणं
मला खरंच जमत नाही

हसू नकोस ..........
खरंच सांगतेय,
हे नाहीत नाटकातले बोल
तुझ्या विचारांसाठीच तर
जीवनातल्या प्रत्येक क्षणाचं
आहे मोल ...........

खोटं वाटतं, तर कधीतरी
डोकावून बघ माझ्या डोळ्यात
आणि दाखव अशी जागा
जिथे तू नसशील रहात .........

विश्वास आहे मला
ती जागा तुला
कधीच मिळणार नाही,
कारण तुला डोळ्यात
कितीही सामावलं
तरीही मनचं भरत नाही

सारखं तुलाच बघावस वाटतं,
तुझ्या डोळ्यात रमावस वाटत
खरं सांगायच तर,
"तुझी होऊन तुझ्यामध्ये सामावावंसं वाटत"
खरं सांगायच तर,
"तुझी होऊन तुझ्यामध्ये सामावावंसं वाटत"

.......सुमन परब (मुंबई)

# पुन्हा ती भेटली तेव्हा.......



.......ज्ञानेश पाटिल (धरणगाव)

भेटलीस तू.... बोललीस तू.....
थांबल्या दिशा, थांबले ऋतू
थांबला जणू काळ तेवढा
काळ जेवढा.. थांबलीस तू !

भासलीस तू कापरापरी,
काजळी जणू.. काजळावरी
कंप पावती ख्रोल पापण्या
सांगती तुझी बातमी खरी

स्मित मोजके, बोलणे कमी
त्याच चौकश्या, तीच बातमी..
जे मनात ते, बोललों कुठे?
होत राहिले हेच नेहमी..

हासणे तुझे.. स्फुंदणे तुझे..
आळसावणे..रंगणे तुझे..
त्या कळा कुठे? रंग ते कुठे?
लोपले कुठे..चांदणे तुझे?

शब्द का मुके? मौन बोलके..?
बोल ना जरा, बोल नेमके
सांग कल्पना, सांग शक्यता
सांग वेदना...सांग हुंदके !

सांग ना तुला, टोचते कुठे?
काय वाटते? बोचते कुठे?
बोलतेस तु त्या तटावरी..
या तटावरी पोचते कुठे?

तीच तू जरी..तोच मी जरी
वेगळे किती वाटतो तरी !
एवढी कशी आज अंतरे?
वाढली कधी, सांग ही दरी?

पोकळी कधी ही भरायची?
उत्तरे कशी सापडायची?
प्रश्न राहिले.. आपल्यामध्ये
वेळ जाहली..तू निघायची..

काय घेतले? काय मी दिले?
काय वाढले? काय छाटले?
आठवे आता एवढेच की...
एकटे मला.. फार वाटले !

एकटे मला.. फार वाटले !

♡ ♡ ♡

# हे प्रेम म्हणजे नक्की काय असतं ?

कुणीतरी सांगाल का हे प्रेम म्हणजे नक्की काय असतं ?
कशाला म्हणतात प्रेम ?

कोणाची तरी सतत आठ्वण येणं हे प्रेम असतं ...
दिवसरात्र त्याचा विचार करणं हे प्रेम असतं...
येणार नाही हें माहित असूनही त्याच्या फ़ोनची वाट बघणं हे प्रेम असतं
की तों नाही म्हणून गर्दीतही एकाकी वाटणं हे प्रेम असतं ...

आर्कुटवर सारखं त्याच्या प्रोफ़ाईलला व्हिजिट करणं...
त्याचा नंबर डायल करून रिंग वाजण्याआधी फ़ोन कट करणं...
मी बोलणारच नाही त्याच्याशी ठरवूनही
फ़ोन नाही तर नाही ... पण  एक मिस काल ची अपेक्षा करणं याला प्रेम म्हणतात
की त्याला गरज नाही तर मी तरी का भाव देऊ असं म्हणूनही
त्याच्या एका सॉरीने क्षणात विरघळून जाणं याला प्रेम म्हणतात

त्याच्या एक नजरेसाठी व्याकूळ होणं याला प्रेम म्हणतात...
त्याच्या मिठीसाठी आतुरणं याला प्रेम म्हणतात...
त्याच्यासाठी वाटणाऱ्या काळजीला प्रेम म्हणतात की
की त्या खास मैत्रीला प्रेम म्हणतात

त्याच्या जगात आपलं स्थान नाही माहित असूनही
त्याच्याबरोबर स्वप्नं रंगवणं याला प्रेम म्हणतात
स्वत:च्याही नकळत त्याच्यात गुंतत जाणं याला प्रेम म्हणतात की
तो सोडून गेल्यावरही चातकासारखी त्याची वाट पहाणं याला प्रेम म्हणतात



.......स्वप्नवेडी-अनघा जोशी
(वसई)

# गुलाबाचं फुल......



.......रुपाली अभी रोडे (द. आफ्रिका)

स्वप्नांची  आकांक्षांची  ईच्छांची सगळी दारं...

बंदच असतात कायम, कड्या अन कुलुपात !!

आणि ....

मत्युच्या दाराच्या कडीत असतं , अडकवलेलं ...

गुलाबाचं टप्पोरं फ़ुल !

“ आय लव्ह यु” च्या चिठ्ठी सकट !!

♡ ♡ ♡

# प्रेमामधली कविता.........



......आनंद माने (सोलापूर)

प्रेम ही एक भावना आहे, आपुलकी हा शब्द थोंडाफार जवळचा आहे,
सहवासाने एकमेकांबद्दलची ओंढ, जिव्हाळा, काळजी वाढत जाते
आणि यातूनच प्रेम रुजतं, फुलतं, बहरतं जातं........

प्रेमामध्ये पडणारा
प्रत्येक जण कवी असतों
प्रेमामध्ये पडणारा
प्रत्येक कवी लिहीत असतों

प्रेमामध्ये लिहिलेलं
चारचौघात कुणी वाचत नाही
पेपरामध्ये तर सोंडाच
भेटकार्डांवरतीसुध्दा छापत नाही

प्रेमामधल्या कवितेला
भाषा नसते कुठलीच
प्रेमामधली कविता
शब्दांमध्ये अडकत नाही

मनापर्यंत पोहचायला
चाल ठेका मागत नाही
प्रेमामधली कविता
भल्याभल्यांना झेपत नाही

म्हणूनच
प्रेमामधली कविता
कुणी कागदावर लिहीत नाही
अन प्रेमामध्ये लिहिलेलं
कुणी चारचौघात वाचत नाही

# चंद्रकोर..........

आता वाजु दे कितीक पैंजण..
आणि होउ दे काकण किणकिण..
भान तुझ्यावर ढळले होते तसे कुणावर..
ना ढळणे आता... ||

पुन्हा वाहु दे झुळुक वारा..
तुझ्या भोती घुटमळुन सारा..
गंध तुझा जो भिनला रोमी तसा कुणाचा
ना भिनणे आता.. ||

भले ठरू दे दवं पानांवर..
जरा निथळता ऑल मनावर..
ठरले होते तुझ्या ओठी दंव तसे कुठेही
ना ठरणे आता.. ||

नजरे खालुन काजळकाडी..
जशी बोटांतुन रात्र ओढली..
कभिन्न काजळ वा रंग केशीचा पेच रातीचा
ना सुटणे आता.. ||

दूर पसरल्या वळणी वाटा..
तोल सावरे मुठीत आता..
घसरला होता तुझ्या वळणांवर तसा कुठे ना
घसरणे आता.. ||



## ....... प्राजक्त देशमुख (नाशिक)

जे सांगायला शब्दांची यात्रा कमी पडते
आणि
जे पोचवायला अक्षरांची जत्रा अपुरी ठरते
त्या प्रेमावर......... मी लिहु ?
नाही जमणार गं.....

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास ‘नेटाक्षरी’ जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ५०००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

**netaksharee@gmail.com**

